# प्राणी कसे झोपतात?

लेखिका: मिलिसेंट सेल्सम

चित्रे: एझरा जॅक कीट्स



# तुम्ही कसे झोपता?

तुम्ही कसे झोपता?

गुडघे हनुवटीपर्यंत मुडपून?

की एखाद्या लांबलचक फळीसारखं अंग पसरून?

तुम्ही कुशीवर झोपता, पाठीवर झोपता की उताणे झोपता?

की आणखी कुठल्या स्थितीत?



रात्री तुम्ही तुमच्या खोलीत बिछान्यावर झोपलेले असता तेव्हा शेतातील, जंगलातील, सरोवरातील आणि नदीतील प्राणीसुद्धा झोपलेले असतात. तुमच्यासारखंच त्यांनाही विश्रांतीची गरज असते.

काही प्राणी जमिनीवर झोपतात, काही पाण्यात झोपतात, काही झाडांवर झोपतात. त्यांना झोपण्यासाठी तुमच्यासारखा बिछाना नसतो. पण ते सर्व आपापल्या पद्धतीने छानपैकी झोप घेतात.



# घोडा कसा झोपतो?

तुम्ही उभ्याउभ्या झोप घेण्याचा प्रयत्न केलात तर बहुधा पडालच. पण *घोडा* त्याच्या चार पायांवर उभा राहून, त्याच्या स्नायूंना आराम देऊ शकतो आणि झोपू शकतो.

घोडा थकल्यावर आपल्या पोटावर किंवा कुशीवर झोपतो. पण बऱ्याचदा तो उभ्यानेच झोप घेतो. तो त्याचे डोळे बंद करतो आणि स्वप्न बघतो, अर्थात घोडे जी स्वप्ने बघतात ती.



# जिराफ कसा झोपतो?

*जिराफ*सुद्धा उभ्याउभ्याच झोपतो. त्याची मान बरीच लांबलचक असते. झोपल्यावर ती खाली लटकते. पण काहीवेळा तो त्याचे डोके झाडाच्या फांदीला टेकवतो. जिराफ कसा झोपतो, हे निश्चित सांगता येत नाही. कारण कुणाची चाहूल लागताच तो चटकन जागा होतो.

जिराफचे पिल्लू आराम करण्यासाठी नेहमी जमिनीवर बसते. मान आरामदायक स्थितीत ठेवण्याची त्याची पद्धत काही वेगळीच असते. ते आपली मान वळवून आपल्या पाठीवर टेकवते आणि डोके आपल्या मागच्या पायांच्या वर ठेवते. अशा प्रकारे जिराफचे पिल्लू स्वत:ची छानपैकी गुठळी बनवून झोपते.





# ओरांगउटान कसा झोपतो?

*ओरांगउटान* हा एक असा प्राणी आहे जो बिछान्यात झोपतो. पण बघा, त्याचा बिछाना कुठे आहे, झाडाच्या उंच टोकावर! लाल केसांच्या केसाळ ओरांगउटानने पाने लगडलेल्या फांद्या तोडून आणि त्या इतर फांद्यांवर मांडून हा बिछाना स्वत:च तयार केला आहे.

ओरांगउटान दिवसभर एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर झोके घेत असतो. तो मिळेल ती पाने-फळे खात असतो. रात्री, थकलेल्या अंगाने तो आपल्या बिछान्यावर ताणून देतो. त्याचा बिछाना डळमळीत असतो आणि हवेच्या झोक्याने हलतडुलत राहातो. पण आपण खाली पडणार नाही याची ओरांगउटान खात्री करून घेतो. तो आपली बोटे आणि पायाचे पंजे लगतच्या फांद्यांना रात्रभर जखडून ठेवतो.



एकदा एका ओरांगउटानला झोपण्यासाठी पलंग दिला. तो त्यावर पाठ टेकवून झोपला. पण झोपण्यापूर्वी त्याने आपल्या हातांनी आणि पायांनी पलंगाच्या खांबांना घट्ट पकडले. झोपल्यावर तो जोरजोरात घोरूही लागला.

# रॉबिन पक्षी कसा झोपतो?

छोटा *रॉबिन* पक्षीसुद्धा एखाद्या झाडावर झोपतो. तोसुद्धा आपल्या पायांनी फांद्यांना जखडून ठेवतो, जेणेकरून झोपल्यावर खाली पडणार नाही. रॉबीन जेव्हा फांदीवर बसतो तेव्हा आपल्या पायातील दोर तो आक्रसून घेतो. यामुळे त्याच्या पायाची बोटे एकत्र होऊन फांदीला सर्वबाजूंनी जखडतात. सकाळी जागे झाल्यावर, आपले अंग वर उचलून तो पायाची बोटे सैल करतो. त्याशिवाय तो उडू शकत नाही. पण रात्रभर तो त्या फांदीवर सुरक्षितपणे झोपतो.

बाहेर थंडी असेल तर, तो आपल्या पिसांची थरथर करून हवेची पातळ रजई बनवतो. ही रजई बाहेरच्या थंडीला त्याच्यापर्यंत पोहोचू देत नाही. तो आपले डोळे बंद करतो आणि काहीवेळा डोके पंखांखाली दुमडतो.

# गोल्डफिश कसा झोपतो?

*गोल्डफिश* पाण्यात राहातो. त्यामुळे तो झोपला तरी पाण्यातच झोपतो. काचेच्या बरणीत ठेवलेला गोल्डफिश सतत इकडून तिकडे फिरत असतो. पण काळजीपूर्वक बघितले तर, काहीवेळा तो आपले पर न हलवता शांतपणे एका जागी आराम करताना दिसतो. त्याच्या डोळ्यांकडे बघा. ते नेहमी खुलेच दिसतात. माशाला पापण्या नसतात आणि त्यामुळे गोल्डफिश त्याचे डोळे बंद करू शकत नाही. मग तो झोपला आहे का? आराम करत आहे, असे तरी किमान म्हणू शकतो आपण.



काही प्राणी उभ्या उभ्याच झोपतात. काही प्राणी जमिनीवर आडवे पडून झोपतात. काही प्राणी झाडाच्या फांदीवर झोपतात. काही प्राणी झाडाच्या शेंड्यावर बिछाना बनवून झोपतात. कसेही झोपले तरी, त्यांना आराम मिळतो, हे महत्त्वाचे.



काही प्राण्यांना एकत्र झोपायला आवडते.

मोठ्या कळपात राहाणारे प्राणी एकत्र झोपतात. काहीवेळा असे शेकडो प्राणी एकाच जागी झोपतात.

कुटुंब बनवून राहाणारे प्राणी सहसा एकमेकांच्या निकट सान्निध्यात झोपतात.

# गोरीला कसे झोपतात?

*गोरीला* कुटुंब बनवून राहातो. दिवसा ते जंगलात अन्नासाठी भटकत राहातात. रसाळ बांबूचे कोंब आणि ताजी, टवटवीत रोपटी दिसली की गोरीला ते सारे खाऊन फस्त करतात.

रात्री झोपण्यासाठी गोरीला ओरांगउटानसारखंच फांद्यांचा आणि पानांचा बिछाना तयार करतो. पण त्यांचा बिछाना जमिनीपासून फार उंचावर नसतो, तर बऱ्यापैकी खाली असतो.

नर गोरीला त्याचा बिछाना जमिनीवरच बनवतो. मादी आणि पिल्ले झाडावरच्या बिछान्यावर झोपतात. झोपताना ते आपले डोके हातांवर टेकतात. ओरांगउटानसारखे ते फांद्यांना घट्ट पकडून ठेवत नाहीत.

बिछाना बनवण्यासाठी गोरीला खूप मेहनत घेतात. हा बिछाना केवळ एकाच रात्री झोपण्यापुरता बनवलेला असतो. पुढल्या दिवशी, ते पुन्हा अन्नासाठी नवनव्या ठिकाणी भटकू लागतात. रात्र पडल्यावर, नवा बिछाना बनवण्यासाठी त्यांचे बळकट बाहू पुन्हा फांद्या तोडू लागतात.

# हत्ती कसे झोपतात?

*हत्ती* मोठा कळप करून राहातात. एका कळपात किमान दहा आणि कमाल शेकडो हत्ती असतात. अन्नाच्या शोधार्थ, ते भटकत असतात.

हत्तींचा कळप झोपतो, तेव्हा काही हत्ती उभ्याउभ्याच झोपतात. पण बरेच हत्ती जमिनीवर एका कुशीवर पडून झोपतात.



जमिनीवर झोपलेल्या हत्तीला जागे झाल्यावर उठून उभे राहाणे, हे एक मोठे काम असते. त्याला त्याचे अवाढव्य शरीर वर उचलण्याचे कष्ट घ्यावे लागतात. तो आपले अंग हलवत-डुलवत आपल्या पायावर उभा राहातो. यामुळेच काही हत्ती उभ्या उभ्या झोपतात, यात काही नवल नाही.



# वॉलरस कसे झोपतात?

खूप सारे *वॉलरस* एकत्र झोपतात तेव्हा त्यांतील काही वॉलरस नक्कीच जागे असतात. वॉलरस अत्यंत दूर उत्तरेला राहातात. ते आपला अधिकांश वेळ बर्फाळ पाण्यातच घालवतात. पण कधीतरी ते खडकांवर किंवा बर्फांच्या तुकड्यांवर चढतात आणि तिथे एकत्र झोपतात.

वॉलरस गाढ झोपी जात नाहीत. ते अध्येमध्ये जागे होतात. जागे झाल्यावर, वॉलरस अवतीभवती न्याहाळतो. बऱ्याचदा त्याच्या नजिक झोपलेला शेजारचा वॉलरसही मग जागा होतो. पहिला वॉलरस पुन्हा झोपी जातो. आता नुकताच जागा झालेला तो शेजारचा वॉलरस अवतीभवती न्याहाळू लागतो. तोवर या वॉलरसच्या जवळचा तिसरा वॉलरस जागा होतो. मग दुसरा वॉलरस पुन्हा झोपी जातो. म्हणजे, कळपातील सारे वॉलरस एकाचवेळी झोपलेले आहेत, असे दिसत नाही.



# पाणघोडे कसे झोपतात?

झोपताना *पाणघोडे* अतिशय मैत्रीपूर्ण वागतात. ते एकमेकांच्या खूप जवळ झोपतात, खरंतर एकमेकांच्यावर अंग टाकून झोपतात, म्हणायला हवे.



हा बघा पाणघोड्यांचा कळप. ते एकमेकांचा वापर उशी म्हणून करतात. याला कुणाचा आक्षेप नसतो. पाणघोडा आपले भलेमोठे डोके शेजारच्या पाणघोड्याच्या पाठीवर टेकवतो. प्रत्येकाकडे अशी *उशी* असते आणि प्रत्येकजण दुसऱ्या पाणघोड्याची *उशी* बनतो.

छोटे पाणघोडे वगळता, सर्व मोठ्या पाणघोड्यांना अशी सुखकर झोप घेणे परवडते. जेव्हा एखादा अवाढव्य पाणघोडा त्याचे विशाल डोके छोट्या पाणघोड्यावर टेकवतो तेव्हा छोटा पाणघोडा वेदनेने ओरडू लागतो आणि अंग हलवून कसंतरी तिथून पळ काढतो.





# स्टार्लिंग पक्षी कसा झोपतो?



काही *स्टार्लिंग* पक्षी दिवसा थव्याने उडतात आणि रात्री एकत्रच आराम करतात.

सूर्यास्ताआधी काही वेळ, शेकडो स्टार्लिंग एकत्र उडत एखाद्या झाडाच्या फांदीवर किंवा इमारतीच्या धुरांड्यावर जाऊन बसतात. रात्री आराम करण्याआधी त्यांचा बराच गलबला सुरू असतो. पण एकदा का सूर्यास्त झाला की त्यांचा कोलाहल आणि कलकलाट कमी होतो. ते आपल्या पायाच्या बोटांनी झाडाची फांदी घट्ट धरून ठेवतात आणि मग शेकडो स्टार्लिंग शांतपणे एकत्र झोपतात.



# टिटमाऊस पक्षी कसे झोपतात?

छोटेसे *टिटमाऊस* पक्षी आपल्या छोट्याशा कुटुंब समूहासह दिवसभर उडत असतात. रात्र पडल्यावर, त्यांच्यातील एक छोटासा पक्षी खाली येऊन एखाद्या झाडाच्या फांदीवर बसतो. मग आणखी एक पक्षी खाली येऊन आधीच्या पक्ष्याजवळ बसतो.



मग तिसरा पक्षी येऊन आधीच्या देन टिटमाऊस पक्ष्यांच्या मधली जागा घेतो. हळूहळू कुटुंब समूहातील इतर टिटमाऊस येऊ लागतात आणि ते सर्व अशाचप्रकारे एका ओळीत बसतात. सुरुवातीला येऊन बसलेले दोन पक्षी या ओळीच्या दोन टोकांना असतात.

काहीवेळा नंतर येणारे पक्षी इतर पक्ष्यांच्या पाठीवर बसतात. शेवटचा पक्षी या सर्वांच्या वर बसतो. यामुळे झोपलेल्या पक्ष्यांचा आकार पिरॅमिडसारखा दिसू लागतो.

# बॉबव्हाइट कसा झोपतो?

*बॉबव्हाइट*, म्हणजेच *क्वेल*, हे प्राणी झाडांमध्ये झोपत नाहीत. ते जंगलात राहातात आणि माती चिवडून टोळ व किडे काढून खातात. सगळे बॉबव्हाइट जमिनीवर एकत्रच झोपतात.



रात्र पडल्यावर, ते जमिनीवर वर्तुळ करून बसतात. त्यांचे तोंड बाहेरच्या दिशेत असते, तर शेपूट वर्तुळकेंद्राच्या दिशेत. झोपेत असताना कोल्ह्याने त्यांच्यावर झडप घातली तर ते सर्व अचानक पंखाचा कर्कश फडफडाट करत हवेत उडतात. प्रत्येक बॉबव्हाइट वेगळ्या दिशेत पळतो. यामुळे बहुतांशी बॉबव्हाइट स्वतःला वाचवू शकतात. धोका टळल्यावर, ते पुन्हा एकत्र येतात, नवीन वर्तुळ बनवतात आणि झोपी जातात.



आपण रात्री अगदी गाढ झोप घेतो. कित्येक प्राणीसुद्धा रात्री दीर्घ काळ विश्रांती घेतात.

पण काही प्राणी दिवसभर झोपून राहातात. सूर्यास्त झाल्याशिवाय ते जागे होत नाहीत.

# घुबड कसे झोपते?

जेव्हा सूर्य अस्ताला जातो तेव्हा घुबड जागे होते. ते त्याचे विशाल पंख पसरवून काळोखात शांतपणे उडू लागते. ते अकस्मात छापा घालून उंदीर किंवा इतर आवडते लहान प्राणी पकडते. काळोखातसुद्धा हे प्राणी त्याला स्पष्ट दिसतात. त्याचे गोल मोठे डोळे खास रात्रीच्या काळोखात भक्ष्य शोधण्यासाठी उपयुक्त असतात.

सूर्योदय झाल्यावर, घुबड जंगलातील काळोख्या भागात जातात आणि तेथे झाडावर दिवसभर झोपून राहातात. त्यांचे मोठे डोळे ते पापण्यांनी झाकून घेतात. त्यांचे शरीर झाडाच्या बुंध्याच्या निकट असते. बुंध्याशी मिळताजुळता शरीराचा रंग असल्याने घुबड आपल्याला दिसणे कठीण असते.





# वटवाघूळ कसे झोपते?

वटवाघूळही रात्रभर जागेच असते. ते सभोवताली अन्नाचा शोध घेत उडत असते. उडत असताना ते वेगाने सूर मारून पतंग आणि इतर किटक पकडते.

सकाळी, ते एखादी फांदी आपल्या पंजांनी घट्ट पकडून ठेवते आणि उलटे लटकत राहाते. आपण कुणी असं करण्याचा प्रयत्न केला, तर आपल्याला चक्करच येईल. पण वटवाघूळ मात्र या विचित्र अवस्थेत मजेत आराम घेत असते.



# साप कसा झोपतो?

काही साप दिवसा फक्त काही तास जागा असतो. पण तो केव्हा झोपतो, हे नेमके सांगणे कठीण आहे. जेव्हा साप आपले डोके अंगाच्या वेटोळ्यावर ठेवून निपचित पडून असतो, तेव्हा कदाचित तो झोपलेला असतो. पण त्याचे डोळे मात्र उघडे असतात.

माशासारखंच, सापालाही पापण्या नसतात. तो त्याचे मण्यासारखे डोळे कधीच बंद करत नाही. ते आपल्याकडेच बघतायत असे वाटते. पण कदाचित तो गाढ झोपलेलाही असू शकतो.

# मांजर कशी झोपते?

एक दीर्घ झोप घेतली की मांजरीला मनाजोगती विश्रांती मिळते. पण मांजर दिवसभरात बऱ्याच डुलक्यासुद्धा घेते.

मांजर एका कुशीवर पडून आपले पाय पसरते. काहीवेळा ती अंगाचे चेंडुसारखं गाठोडे करून छोटीशी डुलकी काढते. झोपल्यावर ती अध्येमध्ये कान आणि मिश्या खाजवते.



# गिनीपिग कसे झोपतात?



छोटासा गिनीपिग हा सर्वात कमी झोप घेणारा प्राणी आहे. त्याचा बराचसा वेळ खाण्यापिण्यातच जातो. पण अध्येमध्ये तो डोळे बंद करून झोपी जातो. मग काही मिनिटांनी तो पुन्हा जागा होतो. आराम मिळण्यासाठी त्याला बहुधा एवढासा वेळ पुरतो.



प्राण्यांच्या झोपण्याच्या वेळासुद्धा वेगवेगळ्या असतात. काही प्राणी फार कमी झोपतात. काही प्राणी बराच वेळ झोपून राहातात. काही प्राणी रात्री झोपतात. काही प्राणी दिवसा झोपतात. पण काही प्राणी त्यांच्या नियमित झोपण्याच्या वेळांव्यतिरिक्त, हिवाळ्यात एक खास दीर्घ झोप घेतात.



हिवाळा ऋतू हा उत्तरेकडील देशांसाठी खूप कठीण काळ घेऊन येतो. उन्हाळ्यातील फळे, पाने गायब होतात. शेते, झरे, तलाव यांच्यावर बर्फ जमा होते. अन्न मिळणे खूप मुश्किल होते.
हिवाळ्याचे आगमन झाल्यावर, पक्षी उबदार हवामान असलेल्या प्रदेशात उडून जातात. त्वचेवर फरचे जाड आवरण असलेला कोल्हा आणि काटक हरीण, कडाक्याच्या थंडीला जुमानत नाहीत. सर्वत्र बर्फ असतानाही ते आपले अन्न मिळवण्यात सक्षम असतात.

काही प्राणी अशा हिवाळ्याला अगदी सहजपणे तोंड देतात. ते संपूर्ण हिवाळाभर झोपून राहातात. रात्र असो, दिवस असो, ते काही खात-पीत नाहीत की हलत-डुलत नाहीत. ते श्वाससुद्धा अतिशय हळू घेतात. त्यांच्या हृदयाचे ठोके अतिशय संथ गतीने सुरू असतात. थोडक्यात, ते सुप्तावस्थेत जातात.



# बेडूक आणि गांडूळ सुप्तावस्थेत कसे जातात?

हिवाळ्याच्या दिवसांत, बेडूक आणि गांडूळ दृष्टीस पडत नाहीत.

नदी-तलावातील पाण्याचे बर्फ बनू लागल्यावर, बेडूक पाण्यात खोलवर जातो आणि तळाच्या चिखलात स्वतःला गाडून घेतो.



हिवाळा आल्यावर, छोटे टोड माती खोदू लागतात. ते मातीत एवढ्या खोलवर जातात जिथे थंडी पोहोचू शकत नाही.

थंडी पडल्यावर गांडूळ मातीत खोलवर बोगदा बनवतात. डझनावारी किंवा कधीकधी शेकडो गांडूळ पाच फूट खोल असलेल्या भोकात दाटीवाटीने राहातात. तिथे ते थंडीने गोठून जाण्याची शक्यता नसते.

बेडूक, टोड आणि गांडूळ, हिवाळा ऋतू सुप्तावस्थेत घालवतात.



# गोगलगाय सुप्तावस्थेत कशी जाते?

गोगलगायी शिंपल्यामध्ये राहातात. हे शिंपले आपल्या पाठीवर घेऊनच त्या सर्वत्र फिरतात.

पानगळीच्या दिवसांत, गोगलगायी आपले खाणेपिणे बंद करतात. त्या खडकांच्या भेगांमध्ये रांगत राहातात किंवा मातीत गाडून घेतात. त्या आपले मऊमुलायम अंग आपल्या शिंपल्याच्या आतमध्ये ओढून घेतात आणि शिंपल्याचे दार बंद करून टाकतात. अशा रितीने, त्या संपूर्ण हिवाळा सीलबंद घरात झोपून घालवतात.

# चिपमंक खार सुप्तावस्थेत कशी जाते?

इतर काही प्राणीही हिवाळ्यात सुप्तावस्थेत जातात. पण ते बेडूक, टोड आणि गांडुळांसारखी गाढ झोप घेत नाहीत.

*चिपमंक* खार वसंत ऋतूत आणि उर्वरीत उन्हाळ्यात फळे आणि बिया शोधत बागडते. ती शक्य होईल तितके अन्न खाऊन घेते. पण काही अन्न ती हिवाळ्यासाठी जमिनीखाली एका भोकात साठवते.

हिवाळा आला की ही खार गोल चेंडूसारखा आकार करून आपल्या भूमिगत घरात झोपते. पण ती गाढ झोपी जात नाही. अध्येमध्ये, ती जागी होते, साठवलेले अन्न खाते आणि पुन्हा झोपी जाते.

# अस्वल सुप्तावस्थेत कसे जाते?

पानगळीच्या दिवसांत, अस्वल फक्त खात, खात आणि खातच असते. या रितीने ते स्वत:ला दीर्घ हिवाळ्यासाठी सज्ज करते. खाऊन खाऊन अस्वल खूप जाडजूड होते. मग हिवाळ्याचे आगमन झाल्यावर, बेरी आणि मासे संपून गेल्यावर, अस्वल एखाद्या पोकळ झाडामध्ये किंवा गुहेमध्ये सुप्तावस्थेत जाते. संपूर्ण हिवाळाभर ते काहीच खात नाही, पण थोडीफार हालचाल वगैरे करते.

वसंत ऋतूच्या सुरुवातीच्या उबदार काळात, अस्वल त्याच्या गुहेतून बाहेर येते. ते खूप बारीक, दुबळे आणि भुकेलेले असते. मग ते पुन्हा खायला सुरू करते. ते संपूर्ण वसंत ऋतू, उन्हाळा आणि पानगळ या काळात फक्त खातच राहाते. हिवाळा येईपर्यंत, जाडजूड झालेले अस्वल पुन्हा त्याच्या दीर्घ हिवाळ्यातील झोपेसाठी सज्ज होते.

# मधमाशा सुप्तावस्थेत जातात का?

संपूर्ण उन्हाळाभर मधमाशा फुलांमधून रस शोषण्यात मग्न असतात. हिवाळ्याचे आगमन झाल्यावर, फुले मरून गेल्यावर, मधमाशा आपले हे काम थांबवतात.

मग त्या मधाने भरलेल्या आपल्या पोळयात विशाल समूह करून राणीमाशीभोवती गोळा होतात. त्या शरीराला उब मिळण्यापुरतीच हालचाल करतात आणि खातात. बराचसा काळ त्या शांत आणि अर्धवट झोपेत असतात.

वसंत ऋतूची चाहूल लागताच, फुलांमध्ये रस तयार होतो. मग मधमाशांच्या पोळ्यात मोठी हालचाल सुरू होते. मधमाशा रांगत बाहेर येतात, आपले पंख उन्हात पसरवतात आणि जवळच्या फुलांकडे झेपावतात.

सर्वच प्राणी झोप घेतात. काही प्राणी चार पायांवर उभे राहून आणि डोळे बंद करून तर काही डोळे उघडे ठेवून झोपतात. काही प्राणी जमिनीवर बसून झोपतात, काही कुशीवर झोपतात, काही फांद्यांवर लटकून झोपतात, काही कठीण बर्फावर झोपतात आणि काही लहान भोकांमध्ये झोपतात.

प्राणी सरळ उभ्याने किंवा उलटे लटकत झोपू शकतात. ते कधी घरटे बनवतात तर कधी नाही. ते दीर्घ झोप घेतात किंवा डुलक्या काढतात. ते दिवसा सूर्यप्रकाशात झोपतात किंवा रात्री काळोखात. ते एकटे झोपतात किंवा कळपात. ते वर्षभर हालचाल करत राहातात किंवा हिवाळाभर सुतावस्थेत जातात. पण एवढे खरे की, सर्व प्राणी झोप घेतात.

झोपेद्वारे ते विश्रांती घेतात आणि नंतर अन्न मिळवण्याचे काम करण्यासाठी आवश्यक असलेली उर्जा साठवून ठेवतात.

समाप्त



जिराफ कसा झोपतो?

हत्ती कसा झोपतो?

गोल्डफिश खरंच झोपतो का?

प्राणी कसे झोपतात?

तुम्हाला या विषयातील तज्ज्ञ

बनायचे आहे का?

मग चोवीस वेगवेगळे प्राणी कसे

झोपतात, याची माहीती या

पुस्तकातून मिळवा.